**आनंदवाडी तालुका देवगड, जिल्हा सिंधुदुर्ग येथे मच्छिमार बंदर व तत्सम बांधकामाच्या अंदाजपत्रकास मुख्य अभियंता, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांनी तांत्रिक मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक- संकीर्ण -१११९/प्र.क्र.५१/बंदरे-१,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- ०५.१२.२०१९

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग क्रमांक-मत्स्यवि-१००८/प्र.क्र.२७५/पदुम-१४, दिनांक ०९.०८.२०१८
२) शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग क्रमांक- डीपीडब्ल्यू-११८९/(५७)/ लेखापरिक्षा, दिनांक १६.१२.२०१५

**शासन परिपत्रक**

मत्स्य व्यवसाय विभागाकडे मुख्य अभियंता हे पद नसल्यामुळे कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाच्या अखत्यारित महाराष्ट्र मत्स्योद्योग विकास महामंडळामार्फत कार्यान्वीत करावयाच्या आनंदवाडी तालुका देवगड, जिल्हा सिंधुदुर्ग येथील मत्स्य बंदराच्या कामास तांत्रिक मान्यता, मुख्य अभियंता, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांच्यामार्फत देणे संयुक्तिक होईल. तसेच यापुढे मत्स्यव्यवसाय विकास विभाग व महाराष्ट्र मत्स्योद्योग विकास महामंडळामार्फत मत्स्य बंदरे, जेट्टी व इतर संलग्न कामे पाहण्यासाठी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाच्या आस्थापनेवर प्रतिनियुक्तीवर कार्यरत असलेले सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मुख्य अभियंत्यांकडून मत्स्यव्यवसाय विकास विभागाच्या कामांना मुख्य अभियंता, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांनी तांत्रिक मान्यता द्यावी.

०२. सदर शासन परिपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ८३९७८/सचिव (रस्ते), दिनांक १५.११.२०१९ अन्वये मान्यता दिल्यानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११३०१२५६२७८०२९ असा आहे. सदरचे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sarangkumar Vasantrao Patil

Digitally signed by Sarangkumar Vasantrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ff4eb5e12b895076f38d0375877408323ed82b780f45ba77108c21a289d50d4b, serialNumber=47644ba707f1cc419e5362269a74b7b1ec6ab4f745648def2597546d88711bb4, cn=Sarangkumar Vasantrao Patil
Date: 2019.12.12 17:03:47 +05'30'

**( सारंगकुमार पाटील )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन विभाग.
४) आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र मत्स्योद्योग विकास महामंडळ, मुंबई.
६) महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता),मुंबई
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई.
८) निवड नस्ती (कार्यासन बंदरे-१)